अमरावती विभागातील जिल्हा सेवा (गट-क) व जिल्हा तांत्रिक सेवा (गट-क) मधील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा, सहायक गट विकास अधिकारी, गट-ब (एस-१५) संवर्गात नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत...
(निवडसूची सन २०२२-२३)

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२३/प्र.क्र.१०६/आस्था-३ अ
बांधकाम भवन, ३ रा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: २९ ऑगस्ट, २०२४

**शासन आदेश :**

अमरावती महसूली विभागातील जिल्हा सेवा (गट-क) व जिल्हा तांत्रिक सेवा (गट-क) मधील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा, सहायक गट विकास अधिकारी, गट-ब (वेतन स्तर एस-१५ : ४१८००-१३२३००) या संवर्गात सन २०२२-२३ या निवडसूची वर्षात सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार, नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने अमरावती विभागातील पदोन्नत अधिकाऱ्यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे नियमित पदोन्नती कोट्यातून तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.बी.बी. पद्मणे<br>विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, मानोरा, जिल्हा वाशिम | सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा बुलढाणा | रिक्त पदी |
| २ | श्री.पी.एम. पंडीत<br>विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, नेर, जिल्हा | गट विकास अधिकारी (मनरेगा), जिल्हा परिषद, यवतमाळ | रिक्त पदी |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| | यवतमाळ | | |
| ३ | श्री.पी.आर. बदरखे<br>सहायक प्रशासन अधिकारी, शिक्षण विभाग (प्राथ.) जिल्हा परिषद, वाशिम | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मानोरा, जिल्हा वाशिम | रिक्त पदी |
| ४ | श्रीमती प्रिती सु. खटींग<br>कृषि अधिकारी, पंचायत समिती, दिग्रस, जिल्हा यवतमाळ | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मोर्शी, जिल्हा अमरावती | रिक्त पदी |
| ५ | श्रीमती ज्योती दि. नेहारे<br>कृषि अधिकारी, पंचायत समिती, पांढरकवडा, जिल्हा यवतमाळ | सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा यवतमाळ | रिक्त पदी |
| ६ | श्री.आर.टी. सुरूशे<br>सहायक पशुधन विकास अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, शेगांव, जिल्हा बुलढाणा | रिक्त पदी |
| ७ | श्रीमती वंदना दि. नानोटे<br>पर्यवेक्षिका, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, प्रकल्प कळंब, बालकल्याण विभाग, यवतमाळ | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नेर, जिल्हा यवतमाळ | रिक्त पदी |
| ८ | श्रीमती वंदना मा. गाडगे<br>पर्यवेक्षिका, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, यवतमाळ | सहायक गट विकास अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद, यवतमाळ | रिक्त पदी |
| ९ | श्री.के.एफ. पिलारे<br>आरोग्य पर्यवेक्षक, पंचायत समिती, धारणी, जिल्हा अमरावती | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, वरूड, जिल्हा अमरावती | रिक्त पदी |

**०२.** मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार, सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनांक ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

०३. उपरोक्त तक्त्यात नमुद कर्मचाऱ्यांना सहायक गट विकास अधिकारी, गट-ब संवर्गात खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

(१) निवडसूची तयार करताना कोणताही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेला नाही अथवा अधिक्रमित झालेला नाही.

(२) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत सा.प्र.वि./१६-अ यांनी दि.२०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार, सदर मान्यता देण्यात येत आहे.

(३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी संबंधित अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(४) निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे, या अटीच्या अधीन सदर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

(५) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२/०९/२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

०४. भविष्यात सदर पदोन्नतीच्या अनुषंगाने न्यायालयीन प्रकरणे किंवा इतर काही आक्षेप आल्यास, त्याबाबतची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्त कार्यालय यांची राहील.

०५. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सहायक गट विकास अधिकारी, गट-ब संवर्गातील तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या संबंधित अधिकारी यांना तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सूचना द्याव्यात.

०६. सहायक गट विकास अधिकारी, गट-ब संवर्गातील तात्पुरती पदोन्नती दिलेल्या संबंधित अधिकारी यांनी, त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजु व्हावे तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी सदर पदाचा पदभार स्वीकारल्यानंतर, त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

**०७.** संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने), नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या तरतूदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचे विरूद्ध शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी. सदर आदेशान्वये दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू न होणाऱ्या अधिकाऱ्यांविरूद्ध संबंधित विभागीय आयुक्त यांनी तात्काळ शिस्तभंग विषयक कार्यवाही सुरू करावी व अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

**०८.** महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम, ३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. तसेच संबंधित अधिकाऱ्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या शासन परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. संबंधित पदोन्नत अधिकारी यांनी पदोन्नतीने पदस्थापनेची नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास, सदर परिपत्रकात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२९१२३१४९४१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.08.29 17:06:26 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ व बुलढाणा.
८. उप सचिव (का-१२ (सेवा-२)), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (आरक्षण-२ (ब)), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, जिल्हा सर्व.
१२.संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).
१३.निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.